**कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना विमा कवच / सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**

**कै. (श्री.) विनोद साहेबराव चव्हाण, सहशिक्षक.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२१/प्र.क्र.८३/टीएनटी-६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२

दिनांक : ०३ जानेवारी, २०२२

संदर्भ:-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र. ४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२० व दिनांक. १४.१०.२०२०.

२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१ /टीएनटी-६, दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र.

३) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांचे पत्र क्र. कोव्हीड-१९/कवच/ सानुग्रह/व्ही एस चव्हाण/२८०९, दिनांक ०९.१२.२०२०.

४) विभागीय शिक्षण उपसंचालक, औरंगाबाद यांचे पत्र क्र. शिउसं/लेखा ३/एसडीआर/२०२१-२२/२४८५, दि. ०५/०५/२०२१

५) विभागीय शिक्षण उपसंचालक, औरंगाबाद यांचे पत्र क्र. शिउसं/लेखा ३/एसडीआर/२०२१-२२/४२०२, दि. १७/०८/२०२१

**ज्ञापन :-**

कै.(श्री.) विनोद साहेबराव चव्हाण, सहशिक्षक यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दिनांक १८/०६/२०२० रोजी मृत्यू झालेला आहे.

२. कै.(श्री.) विनोद साहेबराव चव्हाण, सह शिक्षक यांच्या वारसास वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २९.०५.२०२० च्या शासन निर्णयानुसार रु. ५० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांनी संदर्भ क्र. (३) येथील पत्रान्वये सादर केला आहे.

३. कै.(श्री.) विनोद साहेबराव चव्हाण, सह शिक्षक पदावर मराठवाडा शिक्षण प्रसारक, मंडळ संचलित न्यु हायस्कुल करमाड, ता.जि.औरंगाबाद येथे दिनांक २६/०८/२०१३ पासून कार्यरत होते.

४. कै.(श्री.) विनोद साहेबराव चव्हाण हे कोरोना विषाणू प्रादुर्भाव व प्रतिबंधात्मक उपाययोजनेच्या अनुषंगाने झोन क्र. ०४, महानगर पालिका, औरंगाबाद येथे प्रशासक, महानगर पालिका, औरंगाबाद यांच्या दिनांक २१/०५/२०२० रोजीच्या आदेशाने दि. ०५/०६/२०२० ते दि.०९/०६/२०२० रोजी कर्तव्यावर कार्यरत होते, असे झोन क्र. ०४, महानगर पालिका, औरंगाबाद यांनी प्रमाणित केले आहे.

५. कै.(श्री.)चव्हाण यांचा कोव्हिड-१९ मुळे दिनांक १८/०६/२०२० रोजी मृत्यू झाल्याचे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, औरंगाबाद यांनी दिलेल्या मृत्यू अहवालावरुन स्पष्ट होते.

६. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, औरंगाबाद यांचेकडील कै. (श्री.)चव्हाण यांचे मृत्यू प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे. तहसीलदार कार्यालय औरंगाबाद यांनी कै.(श्री.) विनोद साहेबराव चव्हाण यांचे कायदेशिर वारस म्हणून (पत्नी) श्रीमती सोनाली विनोद चव्हाण, (मुलगी) राजनंदनी विनोद चव्हाण यांना एकत्रित यांना एकत्रित रु. ५०.००लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच / सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

७. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार खाली नमूद लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

"मागणी क्रमांक ई-२, (००)(०१) सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान (अनिवार्य), (२२०२ ०४४२), ३१- सहायक अनुदान (वेतनेतर)."

८. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२२०१०३१८०७५२८१२१ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sameer Anant Sawant
Date: 2022.01.03 18:08:54 +05'30'

**( समीर सावंत )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता:-**

१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (माध्यमिक), पुणे
३. विभागीय शिक्षण उपसंचालक, औरंगाबाद
४. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (माध्यमिक), औरंगाबाद

**प्रतः- माहितीसाठी**

६. वित्त विभाग (व्यय ९)/(व्यय ५), मंत्रालय, मुंबई
७. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस एम ४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
८. श्रीमती सोनाली विनोद चव्हाण, एन ११, ई ३२०/०३ मयुर नगर हुडको, औरंगाबाद
९. निवड नस्ती (टीएनटी-६)(प्र.क्र. ८३/२०२०).